ग्रामिण पायाभूत विकास निधी RIDF - XV अंतर्गत
नाबार्डकडून मिळणाऱ्या अर्थसहाय्यातून पाणलोट
विकास कार्यक्रमासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
**शासन निर्णय क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९ /जल ७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० नोव्हेंबर, २००९.

**वाचा** :- शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग

१) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र.४९/जल-७, दि.२९ ऑक्टोबर, २००९.
२) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र.४९/जल-७, दि.१२ नोव्हेंबर, २००९.
३) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांचे पत्र
क्र. मृदसं/आरआयडीएफ/अनुदान/२२५७/२००९, दि.४ सप्टेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सध्याची भूजलाची स्थिती तसेच भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे (GSDA) आणि महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर (MRSAC) यांच्या अहवालानुसार एकूण १५०५ मेगा पाणलोटांपैकी ७९३ मेगा पाणलोट हे उच्च (High), मध्यम (Medium), कमी (Low) व अत्यंत कमी (Least) प्राथमिकता असलेले पाणलोट आहेत. या अंतर्गत एकूण ५ प्रकारच्या पाणलोटांचा समावेश असून त्यामध्ये उच्च प्राथमिकता अवर्षण प्रवण क्षेत्र, अतिविकसित, विकसित, अंशतः विकसित अशा सर्व बाबींचा अंतर्भात असून सदर पाणलोट त्वरित विकसित करण्याचे निश्चित केले आहे.

२. ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF-XV) अंतर्गत नाबार्डकडून कर्ज उपलब्ध करुन घेऊन वरील नमूद पाणलोटांपैकी प्राथम्यक्रमानुसार जवळ जवळ १०० मेगा पाणलोट विकसित करण्याचा निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९ मे, २००९ रोजी झालेल्या राज्यस्तरीय बैठकीत घेण्यात आला आहे. त्यानुसार सन २००९-१० मध्ये विकसित करण्यासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे (GSDA) आणि महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर (MRSAC) यांनी घोषित केलेल्या ७९३ मेगा पाणलोटांपैकी प्राथमिकतेनुसार प्रत्येक जिल्हयातून ४ असे एकूण १३२ मेगा पाणलोट RIDF-XV अंतर्गत नाबार्डमार्फत उपलब्ध होणा-या निधीतून विकसित करण्यास संदर्भाधीन दि.२९ ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये तत्वतः मान्यता देण्यात आली आहे. त्यांनतर संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये RIDF-XV अंतर्गत नाबार्डमार्फत उपलब्ध होणा-या प्रतिसाधित कर्जातून सन २००९-१० मध्ये निवडलेले एकूण ६५ मेगा पाणलोट विकसित करण्याकरीता मान्यता देण्यात आली आहे.

..२

३. सन २००९-१० या वर्षात RIDF-XV अंतर्गत निवडलेले पाणलोट विकसित करण्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्यापूर्वी नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रत्येक मेगा पाणलोटनिहाय सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करणे बंधनकारक आहे. असे प्रकल्प अहवाल तयार करण्याकरीता आवश्यक असलेले सर्वेक्षण, प्रशिक्षण, भेटी (Expossure Visit), प्रसिध्दी इ. करीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

RIDF-XV अंतर्गत नाबार्ड अर्थसहाय्यातून पाणलोट विकास कार्यक्रम हा प्रथमच राबविण्यात येत आहे. सन २००९-१० मध्ये निवडण्यात आलेले पाणलोट हे मेगा पाणलोट म्हणून विकसित करावयाचे असल्यामुळे त्याची व्याप्ती मोठी आहे. सदर पाणलोट विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यापूर्वी प्रत्येक मेगा पाणलोटाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार तयार करुन नाबार्डकडे सादर करणे आवश्यक आहे. प्रकल्प अहवालास नाबार्डने मान्यता दिल्यानंतरच पाणलोट विकास कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी सुरु होणार आहे.

२. पाणलोट विकास कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्यापूर्वी संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या ६५ मेगा पाणलोटांचे सर्वेक्षण, सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे (DPR), नेट प्लॅनिंग, प्रशिक्षण, भेटी (Exposure Visit), प्रसिध्दी इत्यादी बाबींसाठी **रु.३.०० कोटी (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त)** इतका निधी खालील नमूद लेखाशिर्षाखाली सन २००९-१० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून मंजूर व वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**मागणी क्र.एल-७,**
**४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च**
**१०२-मृदसंधारण, १०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना,**
**१०२ (०१) (२२) मृदसंधारणाच्या उपाययोजनांद्वारे जमिनीचा विकास-**
**नाबार्ड अर्थसहाय्य (योजनांतर्गत) (दत्तमत)**
**(४४०२ २३८७), ३१ सहायक अनुदान.**

३. उपरोक्त परिच्छेदात नमूद केलेला निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून या निधीचे संबंधित क्षेत्रिय अधिका-यांना आवश्यकतेनुसार वितरण करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. वरीलप्रमाणे मंजूर केलेला निधी हा संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या ६५ मेगा पाणलोटांच्या उपरोक्त परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या कामांसाठी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. हा होणारा खर्च प्रत्येक प्रकल्पाच्या एकूण खर्चात अंतर्भूत राहील.

५. प्रत्येक मेगा पाणलोटाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार आणि निकषांनुसार आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत किंवा नाबार्डने सुचविलेल्या अन्य

संस्थांमार्फत तयार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रशिक्षण, भेटी (Exposure Visit) इ. वरील खर्च नाबार्डच्या निकषांनुसार व त्यांच्या अटी व शर्तीप्रमाणे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६६/०९/व्यय-१५, दिनांक १६.११.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२००९११२०१४१७२०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
मा.कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती,
मुख्य सचिव यांचे सह सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुणे.
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
सर्व जिल्हाधिकारी,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,/सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे,/सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व मुख्य वनसंरक्षक, / सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सहसचिव /उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.
निवडनस्ती जल-७.